**कालबध्द / सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजना विहित मुदतीत विभागीय परीक्षा उत्तीर्ण न झालेल्या कर्मचाऱ्यांना लाभ अनुज्ञेय करण्याच्या संदर्भात सुधारित स्पष्टीकरण.......**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन शुध्दीपत्रक क्रमांकः वेतन -१११० /प्र.क्र.०८ /२०१०/सेवा- ३**

खो.क्र.३३५ (विस्तार), तिसरा मजला, मंत्रालय,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई - ४०० ०३२.
तारीख : ०१ फेब्रुवारी, २०२०.

**वाचा-**

१) शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग, क्र:एसआरव्ही-१०९५/प्र.क्र.१/९५/बारा, दिनांक ८ जून, १९९५.
२) शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग, क्र:एसआरव्ही-१०९६/प्र.क्र.३३/९५/बारा, दिनांक २० मार्च, १९९७.
३) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र:वेतन ११९९/प्र.क्र.२/९९/सेवा-३, दिनांक २० जूलै, २००१.
४) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.वेतन ११०९ /प्र.क्र.१/सेवा-३, दिनांक १५ ऑक्टोबर, २००९.
५) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.वेतन ११०९ /प्र.क्र.१/सेवा-३, दिनांक २१ मे, २०१०.

**प्रस्तावना -** संदर्भादिन अनुक्रमांक (१) येथील शासन निर्णयान्वये शासन सेवेतील गट क व ड या संवर्गातील पदांना पदोन्नतीच्या संधी उपलब्ध नसल्याने पदोन्नती मिळण्यास प्रदीर्घ कालावधी लागतो हे लक्षात घेऊन कालबध्द पदोन्नतीची योजना अंमलात आणली होती. त्यासाठी १२ वर्षांची नियमित सेवा व पदोन्नतीसाठी विहित कार्यपध्दतीनुसार ज्येष्ठता, पात्रता, अर्हता परीक्षा, विभागीय परीक्षा या बाबींची पूर्तता होणे आवश्यक असल्याचे स्पष्ट केले होते. ज्या कर्मचाऱ्यांनी सेवाप्रवेशोत्तर किंवा विभागीय परीक्षा उत्तीर्ण न झाल्यामुळे परीक्षा नियमातील तरतुदीनुसार ज्येष्ठता गमावली आहे त्यांच्या बाबतीत विभागीय परीक्षा उत्तीर्ण झाल्यानंतर वरची वेतनश्रेणी केव्हा देण्यात यावी. या संदर्भात सुरुवातीस उपरोक्त संदर्भ क्रमांक (२) येथील शासन निर्णयासोबतच्या परिशिष्टातील अनुक्रमांक २ अन्वये स्पष्टीकरण करण्यात आले होते. या स्पष्टीकरणामध्ये तद्नंतर उपरोक्त संदर्भ क्र.४ येथील शासन निर्णयासमवेतच्या परिशिष्टाअन्वये सुधारीत स्पष्टीकरण देण्यात आले होते. तसेच संदर्भ क्रमांक ४ येथील शासन निर्णयास, संदर्भ क्रमांक ५ अन्वये शुद्धीपत्रक निर्गमित करण्यात आले होते. त्यानंतर याचिका क्रमांक १७९५ / २०१६ व संलग्न याचिकांमध्ये दि.२२.१०.२०१८ रोजी झालेल्या निर्णयास अनुसरुन, संदर्भ क्रमांक ४ व ५ येथील शासन निर्णय रद्द करावेत किंवा कसे ? याबाबतचा प्रस्ताव, शासन स्तरावर काही काळ विचाराधीन होता. त्याबाबत आता पुढीलप्रमाणे सुधारीत शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन शुध्दीपत्रक-**

विहित संधीत / मुदतीत अर्हता परीक्षा किंवा विभागीय परीक्षा उत्तीर्ण न झाल्यामुळे ज्येष्ठता गमावलेल्या व परिणामी कालबध्द पदोन्नतीसाठी अपात्र ठरलेल्या काही कर्मचा-यांनी कालबध्द पदोन्नतीचे लाभ मिळणेबाबत, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणात दाखल केलेल्या मूळ अर्ज क्र.२२/२००५, ७३१/२००६, ३५७/२००६, मूळ अर्ज क्रमांक ३२८ / २०१० व संलग्न मूळ अर्ज यामधील अर्जदार तसेच मुंबई उच्च न्यायालयात दाखल केलेल्या याचिकांमधील न्याय निर्णयाच्या अनुषंगाने, शासन निर्णय वित्त विभाग

दि.१५.१०.२००९ तसेच शासन शुध्दीपत्रक वित्त विभाग दि.२१.५.२०१०, या शासन शुध्दीपत्रका अन्वये रद्द करुन ( Canceling ) पुढील प्रमाणे सुधारित शासन शुध्दीपत्रक निर्गमित करण्यात येत आहे.

| शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग दिनांक २०.३.१९९७ मधील मुद्दा क्रमांक २ समोरील स्पष्टीकरण | सुधारीत स्पष्टीकरण |
|---|---|
| या संदर्भात मूळ निर्णयामधील परि-२ (ब ) मध्ये स्पष्ट केल्याप्रमाणे अर्हतापरीक्षा किंवा विभागीय परीक्षा उत्तीर्ण, होणे आवश्यक आहे. अर्हतापरीक्षा किंवा विभागीय परीक्षा विहित संधीत / मुदतीत उत्तीर्ण न झाल्यामुळे ज्येष्ठता गमावली असेल अशा कर्मचाऱ्यांस त्याची सुधारित ज्येष्ठता निश्चित करुन त्या ज्येष्ठता सूचीवरील त्याच्या कनिष्ठास जर कालबध्द पदोन्नती म्हणून वरची वेतनश्रेणी मिळत असेल तर अन्यथा पात्र ठरत असल्यास त्या कनिष्ठास दिलेल्या तारखेपासून वरची वेतनश्रेणी देण्यात यावी. | अ ) अर्हता परीक्षा किंवा विभागीय परीक्षा विहित संधीत/ मुदतीत उत्तीर्ण न झाल्यामुळे ज्येष्ठता गमावली असेल अशा कर्मचाऱ्याने १२ वर्षाच्या नियमित सेवा कालावधीत सदर परीक्षा उत्तीर्ण केल्यास त्याला नियमित सेवेची १२ वर्ष पूर्ण झाल्यानंतरच्या लगतच्या तारखेस<br><br>अथवा<br><br>ब ) १२ वर्षाच्या नियमित सेवेनंतर, विभागीय / अर्हता परीक्षा उत्तीर्ण झाल्याच्या तारखेस<br><br>उपरोक्त (अ) अथवा (ब) यापैकी कोणत्याही प्रकारात मोडणाऱ्या कर्मचारी / अधिकारी यांना विभागीय पदोन्नती समितीच्या बैठकीतील पात्रतेनुसार, (त्याच्या सुधारीत ज्येष्ठता सूचीतील स्थानात बदल न करता) कालबध्द पदोन्नती योजनेअंतर्गत / सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेअंतर्गत वरिष्ठ वेतनश्रेणी देण्यात यावी. |

- शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग दि.२०.३.१९९७, शासन निर्णय, वित्त विभाग दि.१५.१०.२००९ तसेच शासन शुध्दीपत्रक, वित्त विभाग दि.२१.५.२०१० मधील तरतूदीनुसार, या पूर्वी ज्या कर्मचाऱ्यांना कालबध्द पदोन्नतीचा अथवा सेवा अंतर्गत आश्वासित प्रगती योजनेचा लाभ मंजूर झाला आहे, अशाच कर्मचाऱ्यांना, या शुध्दीपत्रकातील सुधारणेचा लाभ अनुज्ञेय राहील.

- या शासन शुध्दीपत्रकातील तरतूदी नुसार यथास्थिती कालबध्द पदोन्नतीचा अथवा सेवा अंतर्गत आश्वासित प्रगती योजनेचा लाभ मंजूर करण्याबाबतच्या अटी व शर्ती ह्या पूर्वीच्या शासन निर्णयाप्रमाणेच राहतील.

- संबंधित कर्मचारी यास सुधारित लाभ मंजूरीच्या अनुषंगाने अनुज्ञेय ठरणारी वेतन व भत्त्याची रक्कम, यापूर्वी शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग दि.२०.३.१९९७ मधील तरतूदीनुसार मंजूर केलेल्या असुधारित लाभाच्या रकमेशी, समायोजित करुन, फरकाची रक्कम अदा करावी.

- ज्या कर्मचाऱ्यांना यापूर्वी शासन निर्णय वित्त विभाग दि.१५.१०.२००९ व शासन शुध्दीपत्रक वित्त विभाग दि.२१.५.२०१० मधील तरतूदी नुसार कालबध्द पदोन्नती वा सेवा अंतर्गत आश्वासित प्रगती योजनेचा लाभ मंजूर केला आहे, तथापि काल्पनिक वेतन निश्चितीच्या थकबाकीची रक्कम अदा करण्यात आलेली नाही, अशा कर्मचाऱ्यांना, या शुध्दीपत्रकानुसार काल्पनिक वेतननिश्चितीच्या थकबाकीची रक्कम अदा करावी.

हा शासन निर्णय विधि व न्याय विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र. ३५२, दि.२२.०५.२०१९ अन्वये प्राप्त झालेल्या, त्या विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२००१३११५४६४९३८०५ असा आहे. हे शुध्दीपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Bhalchandra Jagannath Gadekar

Digitally signed by Bhalchandra Jagannath Gadekar
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Finance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=93c75178c3c4e1daaeb069f4e437a48fd302aabd765450129e4447d5a1da1f2a, serialNumber=d2671e08dbf49e6a42b865d026c3f07bc1eb8254056eab8fa6b4b0fb72dd47ba, cn=Bhalchandra Jagannath Gadekar
Date: 2020.02.01 12:36:02 +05'30'

**( भा.ज.गाडेकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

| | |
|---|---|
| राज्यपालांचे सचिव<br>मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव<br>सर्व मा. मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव<br>मा.विरोधी पक्ष नेता, विधान परिषद / विधान सभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई<br>सर्व सन्माननीय विधानसभा, विधान परिषद व संसद सदस्य<br>मंत्रालयीन सर्व विभाग<br>सर्व अपर मुख्य सचिव /प्रधान सचिव/सचिव मंत्रालय, मुंबई<br>सचिव, मा.सभापती, विधान परिषद, विधानमंडळ, मुंबई<br>सचिव, मा.अध्यक्ष, विधान सभा, विधानमंडळ, मुंबई<br>मंत्रालयीन सर्व विभागाच्या अधिपत्याखालील | निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई<br>सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,<br>लेखा अधिकारी, वेतन पडताळणी पथक, मुंबई/नागपूर/पुणे/औरंगाबाद.<br>मुख्य अधिकारी, सर्व नगरपालिका,<br>कार्यकारी अधिकारी, कॅन्टझेनमेंट बोर्ड, खडकी/देळूरोड/देवळाली/अहमदनगर<br>कुलसचिव, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहूरी, जिल्हा अहमदनगर<br>कुलसचिव, मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी<br>कुलसचिव, पंजाबराव कृषि विद्यापीठ, अकोला<br>कुलसचिव, कोकण कृषि विद्यापीठ, दापोली, जिल्हा रत्नागिरी<br>कुलसचिव, मुंबई विद्यापीठ, मुंबई |

| | |
|---|---|
| विभाग प्रमुख<br># प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा),मुंबई.<br># प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा),मुंबई.<br>#सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग,मुंबई.<br># सचिव,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.<br>#प्रबंधक,लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय,मुंबई.<br>#मुख्य माहिती आयुक्त, महाराष्ट्र, मुंबई<br># आयुक्त राज्य माहिती आयोग,(सर्व)<br># सचिव राज्य निवडणूक आयोग,मुंबई.<br># प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई/नागपूर/ औंरगाबाद.<br>महासंचालक, यशदा, राजभवन आवार, बाणेर रोड, पुणे<br>सर्व विभागीय आयुक्त.<br>सर्व जिल्हाधिकारी<br>सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदा.<br>महालेखापाल-१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई.<br>महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई<br>महालेखापाल-२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर<br>महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर<br>सिनियर रिसर्च ऑफिसर, पे-रिसर्च युनिट, भारत सरकार, वित्त मंत्रालय, (व्यय विभाग), खोली क्र.२६१, नॉर्थ ब्लॉक, नवी दिल्ली,<br>संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई<br>अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई<br>मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी हिशेब,मुंबई<br>उप मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी हिशेब,मुंबई/पुणे/ नागपूर /औंरगाबाद/ नाशिक /अमरावती.<br>जिल्हा लेखा परीक्षा अधिकारी, स्थानिक निधी हिशेब, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी, जिल्हा अहमदनगर,<br>जिल्हा लेखा परीक्षा अधिकारी, स्थानिक निधी हिशेब,कोकण कृषि विद्यापीठ, दापोली, जिल्हा रत्नागिरी,<br># पत्राने | कुलसचिव, पुणे विद्यापीठ, पुणे<br>कुलसचिव, नागपूर विद्यापीठ, नागपूर<br>कुलसचिव, डॉ. बाबसाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद<br>कुलसचिव, स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड<br>कुलसचिव, शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर<br>कुलसचिव, अमरावती विद्यापीठ, अमरावती<br>कुलसचिव, श्रीमती नाथाबाई दामोदर ठाकरसी महिला विद्यापीठ, मुंबई<br>कुलसचिव, उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ, जळगांव<br>संचालक, माहिती व जनसंपर्क विभाग, मंत्रालय, मुंबई,<br>विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली,<br>ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय ग्रंथालय, सहावा मजला, विधान भवन, मुंबई - ४०० ०३२.<br>बहुजन समाज पार्टी, डी-१ इन्सा हटमेंट, आझाद मैदान, मुंबई १<br>भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ.बॅरॅक नं. १, योगक्षेम समोर, वसंतराव भागवत चौक,नरिमन पॉईंट , मुंबई २०<br>भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, ३१४,राजभुवन, एस.व्ही.पटेल रोड,मुंबई ४<br>भारतीय कम्युनिस्ट पार्टी (मार्क्सवादी), महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅलेस, वरळी, मुंबई १३<br>इंडियन नॅशनल काँग्रेस, महाराष्ट्र प्रदेश काँग्रेस (आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई २५<br>नॅशनलिस्ट काँग्रेस पार्टी, राष्ट्रवादी भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरिमन पॉईंट, मुंबई २१<br>शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई २८<br>वित्त विभागातील सर्व कार्यासने<br>निवड नस्ती, वित्त विभाग (सेवा-३) |